GR - 20040730122331001-1201

ग्राम पंचायतीचे उत्पन्न वाढावे व त्या स्वयंपूर्ण व्हाव्यात म्हणून ग्रामीण भागातचौरस फुटावर आधारीत घरपट्टी आकारण्याबाबत ........

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्रमांक : व्हीपीएम २६००/प्र.क्र. १३५२/२२
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दिनांक - ९ फेब्रुवारी २००१

प्रस्तावना :-

शासनाने दिनांक ३ डिसेंबर १९९९ च्या अधिसूचना क्र. व्हीपीएम २६९९/प्र.क्र. ८८५/२२ नुसार , मुंबई ग्राम पंचायत कर व फी नियम १९६० यात सुधारणा केलेल्या आहेत. या सुधारणा करण्याआधी शासनाने राजपत्रात प्रस्तावित सुधारणांना प्रसिध्दी देवून जनतेचे आक्षेप मागविले होते. मात्र, त्यावेळी या सुधारणांबाबत अल्प आक्षेप प्राप्त झाल्याने शासनाने त्या विचारात घेऊन सदर सुधारणा अंतिम केल्या होत्या. त्यास अनुसरुन चौरस फुटावर आधारीत घरपट्टी आकारणी प्रत्यक्षात सुरु झाल्यावर ब-याच जिल्हयातील रहिवाशांकडून सदर वाढ जास्त असल्याच्या तक्रारी प्राप्त झाल्या. तसेच याबाबत काही लोक प्रतिनिधींकडूनही या शासन निर्णयाचा पुनर्विचार करण्याच्या सूचना प्राप्त झाल्या होत्या. यासर्व सूचना व विनंती अर्ज विचारात घेण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

शासन निर्णय :-

(१) त्यास अनुसरुन शासनाने आता असा निर्णय घेतला आहे की, दि. ३ डिसेंबर १९९९ च्या सुधारणेनुसार , घरपट्टी आकारणीबाबत स्वीकारलेल्या सुत्रात कोणताही बदल करणे आवश्यक नाही. मात्र, प्रस्तुत दराप्रमाणे आकारण्यात यावयाच्या घरपट्टी रकमेबाबत खालील सवलती देण्यात येत आहेत.

१. दिनांक ३ डिसेंबर ९९ च्या अधिसूचनेव्दारे, निश्चित केलेल्या दराप्रमाणे ग्रामपंचायतींनी चालू आर्थिक वर्षात आकारणी केलेली घरपट्टी सरसकट २५ % (पंचवीस टक्के) ने कमी करावी.

२. ग्राम पंचायतींनी अंतिमत: करावयाची घरपट्टी रक्कम आकारणी (पंचवीस टक्के कमी केल्यानंतर) ही मागील वर्षाच्या आकारणीच्या (जुन्या दराने येणारी घरपट्टी) तीनपटीपेक्षा जास्त नसावी.

३. ग्राम पंचायतींनी अंतिमत: करावयाची आकारणी (पंचवीस टक्के कमी केल्यानंतर) आणि तीन पटीने करावयाची आकारणी यामध्ये असणारा फरक, यापुढील चार वर्षात चार समान हप्त्यामध्ये टप्पाटप्प्याने वाढवून आकारणी करावी. (उदाहरण विवरण अ सोबत जोडले आहे.)

४. ग्राम पंचायतींनी अंतिमत: करावयाची आकारणी (पंचवीस टक्के कमीकेल्यानंतर) ही मागील वर्षाच्या आकारणीच्या (पूर्वीच्या आकारणीप्रमाणे येणारी घरपट्टी) ही तीनपटीपेक्षा कमी असल्यास, ग्रामपंचायतीने सर्व रक्कम चालू आर्थिक वर्षात वसूल करावी.

५. चालू आर्थिक वर्षात ज्या व्यक्तींनी नवीन आकारणी प्रमाणे घरपट्टीचा भरणा केलेला असेल त्यांची वसुली पुढील वर्षांमध्ये (उपरोक्त सुत्रानुसार) ग्रामपंचायतीने समायोजित करावी व त्याप्रमाणे उर्वरित रक्कम वसुल करण्यात यावी.

६. खुल्या जागेवरील आकारणी चालु वर्षाच्या आकारणीच्या ५० % (पन्नास टक्के) पुढील वर्षापासून आकारण्यात यावी. यावर्षी मात्र आकारणीप्रमाणे रक्कम भरावी.

(२) ग्रामपंचायतींनी गांवात किमान दरापेक्षा कमी दर आकारु नये व जो दर आकारला जाईल तो गावातील सर्व घरांना सारखाच ठरवावा. (निवासी /व्यापारी ) .तथापि घरपट्टीची रक्कम कोणत्याही परिस्थितीत मागील वर्षीच्या रकमेपेक्षा (जुन्या दराने आकारलेल्या) कमी होणार नाही याची दक्षता ग्राम पंचायतीने घ्यावी.

(३) याबाबत असेही स्पष्ट करण्यात येते की, घरपट्टी सुधारीत दराने आकारण्याबाबतचा निर्णय घेण्यामागे शासनाचा मुख्य उद्देश , ग्राम पंचायतीचे उत्पन्न वाढून त्यांनी रहिवाशांना जास्तीत जास्त सुविधा उपलब्ध करुन द्याव्यात, हाच असल्याने शासनाने मान्य केलेल्या सुत्रात कोणताही बदल केलेला नाही-फक्त वर नमूद सवलती जाहीर केल्या आहेत. त्यामुळे, याबाबत अधिक स्पष्टीकरणाची आवश्यकता असल्यास, संबंधितांनी शासनाशी संपर्क साधावा.

हे आदेश त्वरीत परिणामाने लागू करण्यात येत आहेत.

राज्यपालांच्या आदेशानुसार व नांवाने,

( कुंदा गोसावी )
उपसचिव , महाराष्ट्र शासन

प्रति
१) मा. राज्यपाल यांचे सचिव
२) मा. मुख्यमंत्री यांचे सचिव
३) मा. मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव
४) मा. राज्यमंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव
५) विभागीय आयुक्त , (सर्व)
६) जिल्हाधिकारी , (सर्व)
७) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व )
८) गट विकास अधिकारी , (सर्व ) ( मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदेमार्फत)
९) मंत्रालयातील सर्व विभाग
१०) ग्रा. वि .वि. मधील सर्व कार्यासने.
११) निवड नस्ती , का.क्र. २२